**मनसे पक्षातर्फे टोल विरोधी आंदोलनात भाग घेतलेल्या लोकांना ताब्यात घेवून त्यांना संबंधित ठिकाणी पोहचविण्याकरीता भाडेतत्त्वावर अधिग्रहित केलेल्या एस.टी. महामंडळाच्या बसेसच्या भाड्यापोटी देय असलेली रु. ९२,५६१/- इतकी रक्कम अदा करण्याच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ०४१६/३८१५/प्र.क्र.५३/ विशा १ अ**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ०४ जानेवारी, २०१७.

**संदर्भ :-** पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं/ ३० /३५७७/वाह.अधि. ठाणे शहर /२३४/ २०१४, दिनांक ७.१०.२०१६.

**प्रस्तावना :-**

दिनांक १२.२.२०१४ रोजी मनसे पक्षातर्फे टोल विरोधी आंदोलनात भाग घेतलेल्या लोकांना ताब्यात घेवून त्यांना संबंधित ठिकाणी पोहचविणेकरीता ठाणे व भिवंडी एस.टी. महामंडळाकडून ६ बसेस भाडे तत्वावर अधिग्रहित केल्या होत्या. सदर अधिग्रहित करण्यात आलेल्या एस. टी. महामंडळाच्या बसेससाठीच्या रु. ९२,५६१/- (रु. ब्याण्णव हजार पाचशे एकसष्ट फक्त) इतक्या भाडेखर्चास कार्योत्तर मंजूरी मिळणेबाबत तसेच, सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून सदर रक्कम खर्च करण्यास कार्योत्तर मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णय:-**

दिनांक १२.२.२०१४ रोजी मनसे पक्षातर्फे टोल विरोधी आंदोलनात भाग घेतलेल्या लोकांना ताब्यात घेवून त्यांना संबंधित ठिकाणी पोहचविण्याकरीता ठाणे व भिवंडी एस.टी. महामंडळाच्या अधिग्रहित केलेल्या बसेसचा रु. ९२,५६१/- (रु. ब्याण्णव हजार पाचशे एकसष्ट फक्त) इतका भाडेखर्च अदा करण्याच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

सदरचा खर्च मागणी क्र ."बी-१ २०५५, पोलीस (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (००) (०१) जिल्हा पोलीस बल, दत्तमत (२०५५०१६८) ५०- इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०१६-१७ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ ५१४ / १६ /व्यय- ७, दिनांक १५.११.२०१६ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०१०४१४१५२१६२२९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay D Patil

Digitally signed by Vijay D Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5254aa09c72b0eb445f264826ab10bb42793fc26e3838113296e7ff812051f6f, cn=Vijay D Patil
Date: 2017.01.04 14:19:59 +05'30'

**(विजय पाटील)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, ठाणे.
३. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
४. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
५. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. निवडनस्ती.